**प्रलंबित आश्वासनाच्या पूर्ततेबाबत**

**महाराष्ट्र शासन**

क्रमांक - विसआ २००८/प्र.क्र.१/सहा
संसदीय कार्य विभाग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- १४ ऑक्टोबर, २००८.

**वाचा** :- १) शा.नि.क्र.एलईजी-१०९८/प्र.क्र.५१/९८/पांच, दि.२/१२/१९९८.
२) शा.प.क्रविपआ-१०२०/प्र.क्र.२८/२०००/चार, दि.२१/१०/२०००.
३) शा.प.क्र.विउसू-२००६/५२७/चार, दि.५/४/२००६.

**शासन परिपत्रक**

महाराष्ट्र विधानमंडळाच्या विधानपरिषद व विधानसभा या उभय सभागृहामध्ये शासनातर्फे मा.मंत्री/राज्यमंत्री महोदयांकडून देण्यात आलेल्या आश्वासनांची पूर्तता ९० दिवसांच्या कालावधीत करणे ही शासनाची वैधानिक जबाबदारी आहे, तसेच आश्वासन समित्यांनी देखील त्यांच्या अहवालामध्ये आश्वासनांची पूर्तता करण्यासाठी होत असलेल्या विलंबाबाबत नापसंती व्यक्त केलेली आहे. त्याबाबत सर्व विभागांना वेळोवेळी आवश्यक कार्यवाही करण्याबाबत सूचना देण्यात आलेल्या असून, अशा सूचना उपरोक्त दि.५ एप्रिल २००६ च्या शासन परिपत्रकाव्दारे पुन्हा देण्यात आल्या आहेत. असे असूनही, मंत्रालयीन विभागांकडून आश्वासन पूर्ततेबाबत गंभीरपणे दखल घेऊन त्वरेने कार्यवाही केली जात नाही व काही विभागांमध्ये अद्यापही प्रलंबित आश्वासनांची संख्या मोठ्या प्रमाणावर असल्याबाबत काही सन्माननीय सदस्यांनी दि.२६ जुलै २००८ रोजी महाराष्ट्र विधानसभेमध्ये आश्वासन पूर्ततेची माहिती सभागृहापुढे ठेवतांना झालेल्या चर्चेमध्ये मुद्दा उपस्थित केला व आश्वासन पूर्ततेच्या संदर्भात विलंबाने कार्यवाही होत असल्याचे निदर्शनास आणून दिले आहे. त्या संदर्भात मा.मंत्री महोदयांनी असे आश्वासन दिले की, मा.सदस्यांच्या भावना लक्षात घेऊन, संबंधीत विभागाच्या सचिवांना आश्वासन पूर्तीसाठी योग्य त्या सूचना देण्यात येतील. त्यांनी वेळीच योग्य ती कार्यवाही केली नाही, तर त्यांच्यावर कारवाई केली जाईल.

२ प्रलंबित आश्वासनांच्या पूर्ततेसाठी मुख्य सचिवांच्या स्तरावर वेळोवेळी आढावा घेण्यात येत असून, विभागीय सचिवांच्या स्तरावरदेखील या संदर्भात आढावा घेण्यात येत आहे. तथापि उपरोक्त वस्तुस्थिती लक्षात घेऊन, सर्व विभागाच्या सचिवांना असे निदेश देण्यात येत आहेत की, आश्वासनांची पूर्तता वेळेवर होण्याच्या दृष्टीने त्यांच्याकडून आवश्यक ती दक्षता घेण्यात यावी आणि विलंबाने कार्यवाही होत असल्यास, संबंधितांविरुध्द योग्य ती कारवाई करण्यात यावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

सही/-
(जॉनी जोसेफ)
मुख्य सचिव महाराष्ट्र शासन.

प्रति :- १) सर्व अप्पर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,
२) मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
३) उपमुख्यमंत्र्यांचे सचिव,
४) प्रधान सचिव/सचिव महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई-४०० ०३२,
५) सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
६) सर्व मंत्रालयीन विभाग,
७) निवड नस्ती